स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत शहरांनी हागणदारी मुक्तीचा दर्जा शाश्वतरित्या टिकविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: स्वमअ-२०१७/प्र.क्र.३१/नवि-३४**
शहीद भगतसिंग चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७ मार्च, २०१७

**वाचा -**

शासन निर्णय क्र. नगर विकास विभाग, स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४, दि.१५ मे २०१५.

**शासन आदेश -**

केंद्र शासनाच्या "स्वच्छ भारत अभियान (नागरी)" च्या धर्तीवर दिनांक १५ मे, २०१५ च्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)" ची अंमलबजावणी सुरू झाली आहे. या अभियांनांतर्गत शहरे "हागणदारी मुक्त" करणे व घनकचरा व्यवस्थापनांतर्गत "स्वच्छ" करणे या दोन प्रमुख बाबींचा समावेश आहे.

२. या अभियानांतर्गत शहरांमधील ज्या कुटुंबांकडे शौचालयाची सुविधा उपलब्ध नसल्याने जी कुटुंबे उघडयावर शौचास जातात, अशा कुटुंबांना वैयक्तीक घरगुती शौचालय (IHHL) अथवा सामुदायीक शौचालयाची (CT) सुविधा उपलब्ध करून देवून शहरे हागणदारी मुक्त करण्यात येत आहेत.

३. राज्यातील सार्वजनिक शौचालय वापरणाऱ्या कुटुंबांची संख्या (२१%) देशपातळीवरील सार्वजनिक शौचालय वापरणाऱ्या कुटुंबांच्या संख्येच्या सरासरीपेक्षा जास्त आहे. या अभियानातंर्गत शहरे हागणदारी मुक्त झाल्यानंतर हागणदारी मुक्त शहराचा दर्जा शाश्वत रित्या टिकविण्यासाठी (ODF Sustainability) जास्तीत जास्त कुटुंबांना वैयक्तिक घरगुती शौचालयाची सुविधा उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. तसेच शहरांमध्ये बांधण्यात आलेल्या शौचालयांच्या सेप्टीक टॅंक मधील मैला व्यवस्थापन करणे आवश्यक आहे.

४. हागणदारी मुक्त शहर (ODF) व ODF+ तसेच ODF++ शहरांचे निकष पुढील प्रमाणे आहेत.:-

| | **निकष १** | **निकष २** | **निकष ३** |
|---|---|---|---|
| **ODF शहरे** | दिवसाच्या कुठल्याही वेळेस शहराच्या कुठल्याच भागात एकाही व्यक्तीने उघड्यावर शौचास बसल्याचे आढळून न येणे, तसेच शहरामध्ये कुठेही उघड्यावर मानवी विष्ठेचे पुरावे न दिसणे | प्रत्येक कुटुंबास, संस्थेस व इतर सर्व प्रकारच्या मालमत्तांना शौचालयांची उपलब्धता असणे. (स्वतःची अथवा गट शौचालये / सार्वजनिक शौचालये) | शहरातील सर्व शौचालये सुरक्षित मैला संकलन व विल्हेवाट प्रणालीस जोडलेली असणे. |

| | | | |
|---|---|---|---|
| **ODF+ शहरे** | दिवसाच्या कुठल्याही वेळेस शहराच्या कुठल्याच भागात एकाही व्यक्तीने उघड्यावर शौचास बसल्याचे आढळून न येणे, तसेच शहरामध्ये कुठेही उघड्यावर मानवी विष्ठेचे पुरावे न दिसणे | प्रत्येक कुटुंबास, संस्थेस व इतर सर्व प्रकारच्या मालमत्तांना शौचालयांची उपलब्धता असणे. किमान ८०% कुटुंबांकडे स्वतःची शौचालये असणे व उर्वरित कुटुंबांना सुस्थितीतील गट शौचालय अथवा सार्वजनिक शौचालयाची (कमाल ६ कुटुंबांना १ सीट या प्रमाणे) सुविधा उपलब्ध असणे व ती कुटुंबे त्याचा नियमित वापर करीत असणे. | शहरातील सर्व शौचालये सुरक्षित मैला संकलन व विल्हेवाट प्रणालीस जोडलेली असणे. मैलाचे सुरक्षित व नियमित व्यवस्थापन व प्रक्रिया केली जाणे. (शौचालये सेप्टिक टाक्यांना जोडलेली असल्यास, टाक्या नियमितपणे साफ होणे व त्यातील मैलावर योग्य ती प्रक्रिया करणे.) |
| **ODF++ शहरे** | दिवसाच्या कुठल्याही वेळेस शहराच्या कुठल्याच भागात एकाही व्यक्तीने उघड्यावर शौचास बसल्याचे आढळून न येणे, तसेच शहरामध्ये कुठेही उघड्यावर मानवी विष्ठेचे पुरावे न दिसणे | प्रत्येक कुटुंबास, संस्थेस व इतर सर्व प्रकारच्या मालमत्तांना शौचालयांची उपलब्धता असणे. किमान ९५ % कुटुंबांकडे स्वतःची शौचालये असणे व उर्वरित कुटुंबांना सुस्थितीतील गट शौचालय अथवा सार्वजनिक शौचालयाची (कमाल ६ कुटुंबांना १ सीट या प्रमाणे) सुविधा उपलब्ध असणे व ती कुटुंबे त्याचा नियमित वापर करीत असणे. | शहरातील सर्व शौचालये सुरक्षित मैला संकलन व विल्हेवाट प्रणालीस जोडलेली असणे. मैलाचे सुरक्षित व नियमित व्यवस्थापन व प्रक्रिया केली जाणे. (शौचालये सेप्टिक टाक्यांना जोडलेली असल्यास, टाक्या नियमितपणे साफ होणे व त्यातील मैलावर योग्य ती प्रक्रिया करणे.) शहरात जमा होणाऱ्या सांडपण्यावर योग्य ती प्रक्रीया करणे. |

५. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत हागणदारी मुक्त शहराचा दर्जा कायम स्वरूपी टिकवून ठेवण्यासाठी सार्वजनिक शौचालयावरील भार कमी करून शहरामध्ये ज्या कुटुंबाकडे वैयक्तीक शौचालय बांधण्यासाठी जागा उपलब्ध आहे अशा सर्व कुटुंबांना वैयक्तीक शौचालये उपलब्ध करून देवून आपले शहरास ODF+ व ODF++ हा दर्जा प्राप्त करण्यासाठी प्राधान्याने प्रयत्न करावेत. तसेच, शहरांमध्ये बांधण्यात आलेल्या शौचालयांच्या सेप्टीक टँक नियमितपणे साफ करून त्या मैल्यावर व सांडपाण्यावर योग्य ती प्रक्रीया करण्यात यावी.

६. हागणदारी मुक्त झालेल्या शहरास ODF+ व ODF++ हा दर्जा प्राप्त करण्यासाठी, संबंधित शहरास हागणदारी मुक्त झाल्यानंतर मिळणाऱ्या प्रोत्साहन निधीचा तसेच १४ व्या वित्त आयोगातंर्गत प्राप्त निधीचा वापर करता येईल.

७. हागणदारी मुक्त झालेल्या शहरांपैकी जी शहरे ODF+ व ODF++ हा दर्जा प्राप्त करतील अशा शहरांची तपासणी राज्यस्तरीय समितीकडून करण्यात येईल व या तपासणीमध्ये पात्र ठरणाऱ्या शहरांना त्याबाबतचे प्रमाणपत्र देण्यात येईल.

८. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०३१७१५३७४६८८२५ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2017.03.17 15:39:02 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नगर विकास-१), मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (नगर विकास-२), मंत्रालय, मुंबई.
६. सर्व विभागीय आयुक्त.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय,मुंबई
८. सर्व जिल्हाधिकारी.
९. सह सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
११. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगर पंचायती.
१२. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान संचालनालय, मुंबई
१३. निवडनस्ती (नवि-३४).